दर्शनिका विभागास "Gazetteers : Past, Present and Future" या विषयावरील चर्चासत्र आयोजित करण्यास व त्यासाठी होणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- दर्शनि-२०२४ /प्र.क्र.११८/सां.का. २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०५ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-** १. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक -५६४, दि.०५.०७.२०२४
२. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक -६४८, दि.२२.०७.२०२४
३. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक -६४९, दि.२३.०७.२०२४

**प्रस्तावना :**

दर्शनिका विभाग, मुंबई या कार्यालयाची दि.३१ ऑक्टोबर, १९६४ रोजी स्थापना झाली असून, दर्शनिका विभागाच्या स्थापनेच्या हिरक महोत्सवी वर्षानिमित्त, महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका संपादक मंडळाच्या दि.०३.०२.२०२३ रोजी झालेल्या ७४ व्या बैठकीत, मा. प्रधान सचिव (सां.का.) यांनी "दर्शनिका विभागाद्वारे अखिल भारतीय गॅझेटीअर परिषदेचे आयोजन करावे" असे निर्देश दिलेले आहेत. सदर निर्देशाच्या अनुषंगाने, दर्शनिका विभागाकडून, दि.०५ व ०६ ऑगस्ट, २०२४ रोजी फ्लेम विद्यापीठ, पुणे येथे "गॅझेटीअरचे महत्व व विषननिहाय मांडणी, माहिती व तंत्रज्ञानाचा गॅझेटीयरमध्ये उपयोग, तसेच विविध राज्यांतील गॅझेटीअर विभागाचे आजपर्यंत झालेले काम, भविष्यातील प्रकल्प, विविध राज्यातील प्रकाशने व त्यांचे स्वरुप, संपूर्ण देशातील सर्व गॅझेटीअरमध्ये एकसूत्रता आणणे" या विषयावर दोन दिवसीय चर्चासत्र आयोजित करण्यात येणार असल्याचे कळविले आहे. सदर चर्चासाठी अंदाजित रु.३.०० लक्ष इतका खर्च होणार असून, सदर चर्चासत्र आयोजनास प्रशासकीय व त्यासाठी होणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव, उपरोक्त संदर्भाधीन पत्रांन्वये कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग यांनी शासनास सादर केला आहे. त्यानुसार सदरच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील दर्शनिका विभागाच्या स्थापनेच्या हिरक महोत्सवी वर्षानिमित्त, दर्शनिका विभाग, मुंबई व फ्लेम विद्यापीठ, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने, दि.०५ व ०६ ऑगस्ट, २०२४ रोजी फ्लेम विद्यापीठ, पुणे येथे दोन दिवसीय राष्ट्रीय पातळीवरील "Gazetteers : Past, Present and Future" या विषयावरील चर्चासत्र आयोजित करण्यास व त्यासाठी होणाऱ्या रु.३,००,०००/- (रुपये तीन लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चास सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर चर्चासत्र संपन्न झाल्यानंतर बाबनिहाय खर्चाचा तपशिल शासनास सादर करण्याची जबाबदारी कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई यांची राहिल.

०३. सदरचा खर्च "झेडडी-२, २०७०, महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका (२२७० ०७९१) अंतर्गत ११- देशांतर्गत प्रवास खर्च व १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०४. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र. वि.अ.प/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग दोन, दि. १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-एक, उप विभाग-तीन अ.क्र.४, परिच्छेद २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०८०५१५२२३०६३२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a18662 0ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C53268 4054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.08.06 11:05:57 +05'30'

**( नंदा मा. राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता महाराष्ट्र-१, मुंबई.
४. उप सचिव (सां.का.२), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय, मुंबई.
५. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती, सां.का.२.